**महिला व बालकांचे सायबर गुन्ह्यांपासून प्रतिबंध करण्याकरीता एक प्रशिक्षण व कार्यरत न्यायसहाय्यक प्रयोगशाळा स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :संकीर्ण-०११८/प्र.क्र.८३/विशा-६**
**मंत्रालय, , मुंबई ४०००३२**
**दिनांक -०१/०१/२०१९**

**संदर्भः** (१) गृह मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र. २५०१७/०७/२०१७-PM-III, दि.२८/०९/२०१७
(२) गृह मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र. २५०१७/०७/२०१७-PM-III, दि.८/११/२०१७
(३) गृह मंत्रालय ,भारत सरकार यांचे पत्र क्र. २५०१७/०७/२०१७-PM-III/CIS- II, CIS विभाग,दि.१२/०३/२०१८
(४) गृह मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र.२५०१७/०७/२०१७/PM-III/CIS-II,CIS विभाग, दि. २३/०३/२०१८
(५) विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर व म.अ.प्र.मुंबई यांचे पत्र क्र. १३४/एमएच-सायबर/ सीसीपीडब्लुसी/२०१८ दि.२७/०२/२०१८

**प्रस्तावना : -**

अलिकडच्या काळात इंटरनेटच्या वापरामध्ये व बदल होत असलेल्या तंत्रज्ञानाच्या अनुषंगाने सायबर क्राईमच्या गुन्ह्यांमध्ये वाढ झालेली आहे.यामध्ये एसएमएस/चॅट ,सायबर बदनामी,चाईल्ड पोर्नोग्राफ़ी,ओळख चोरणे,रोमान्स स्कॅम,ट्रोलींग ,खंडणी,आर्थिक गुन्हे,माहितीची चोरी,शासकीय संकेत स्थळे हॅक करणे याप्रकारचे अनेक गुन्हे अपु-या साधनांनी तपास करणे अवघड होत आहे.इंटरनेट गुन्ह्यांमध्ये पुरावा गोळा करणे करणे अवघड झाल्याने अशाप्रकारच्या गुन्ह्यांमध्ये तपास एकत्रितरित्या व अत्याधुनिक तंत्रज्ञानाच्या सहाय्याने करणे आवश्यक ठरत आहे.यासंदर्भात केंद्रीय गृह मंत्रालयाने महिला व बालकांचे सायबर गुन्ह्यांपासून प्रतिबंधात्मक उपाययोजना करण्यासाठी एक प्रशिक्षण व कार्यरत न्यायसहायक प्रयोगशाळा स्थापन करण्यासाठी राज्यनिहाय अनुदान उपलब्ध करून दिलेले आहे.विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर गुन्हे यांनी केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशानुसार राज्यामध्ये सायबर युनिट स्थापन करण्यासंदर्भात खालीलप्रमाणे युनिटची रचना प्रस्तावित केलेली आहे.

अ) सायबर गुन्ह्याचा तपासः सर्व प्रकारच्या सायबर गुन्ह्यांची नोंद तसेच राष्ट्रीय आनलाईन सायबर गुन्हे संकेतस्थळामार्फ़त नोंद झालेल्या गुन्ह्यांचा तपास सायबर क्राईम फॉरेन्सिक लॅबोरेटरी/ प्रशिक्षण केंद्रांतर्गत करणे.(CCPWC)

ब) प्रशिक्षण केंद्रः भारत सरकार,गृह मंत्रालयाने ठरवून दिलेल्या उद्दिष्टांनुसार प्रशिक्षण केंद्रामध्ये पोलीस,सरकारी अभियोक्ता व न्यायविषयक अधिकारी यांना प्रशिक्षण देणे.

०३ दिवसाचे प्रशिक्षणामध्ये ११६२पोलीस ठाणे व यामधील कोणत्याही व्यक्ती ११०० व ११० महिलांचा समावेश तसेच ६०० शासकीय अभियोक्ते व ६०० न्यायाधीशांचा समावेश असणार आहे तसेच ०५ दिवसांच्या प्रशिक्षणामध्ये ६३० एसएचओ व २० महिलांचा समावेश असणार आहे.

सदर बाब विचारात घेऊन राज्यामध्ये महिलांवरील व बालकांवरील सायबर गुन्ह्यांपासून प्रतिबंधात्मक उपाययोजना करण्यासाठी न्यायसहायक प्रयोगशाळा व प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

गृह मंत्रालय,भारत सरकार यांनी दिलेल्या निर्देशानुसार राज्यातील महिला व बालकांचे सायबर गुन्ह्यांपासून प्रतिबंधात्मक उपाययोजना करण्यासाठी विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर गुन्हे यांनी सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन केंद्र शासनाच्या Cyber Crime Prevention for Women And Children (CCPWC) योजनेंतर्गत एक प्रशिक्षण व कार्यरत न्यायसहायक प्रयोगशाळा स्थापन करण्यास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहील.

१) केंद्र शासन,गृह विभागामार्फ़त वितरीत करण्यात आलेला निधीचा विनियोग/खर्च केंद्र / राज्य शासनाच्या प्रचलित नियमानुसार विहीत पध्दतीने येणा-या किंमतीनुसार व शिर्षनिहाय विहीत करण्यात आलेल्या एकूण वित्तिय मर्यादेच्या अधीन राहून व यासंदर्भातील वित्तिय औपचारिकता पूर्ण करुन करण्यात यावी.

२) कोणत्याही परिस्थितीत प्राप्त निधी संचित (parking) स्वरूपात ठेवण्यात येऊ नये.यानुषंगाने प्राप्त निधीचा विनियोग झाल्यानंतर विहीत कालावधीत योग्य त्या विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र (utilization certificate)सादर करावे.प्रस्तुत योजनेचे प्राधिकारी म्हणून केंद्रशासनाच्या आवश्यकतेनुसार अंतर्गत लेखापरिक्षणासाठी यासंदर्भातील लेखे अद्यावत ठेवण्यात यावे.

सदरहू योजनेंतर्गत केंद्र शासनाने मंजूर केल्याप्रमाने Cyber Forensic Consultants यांच्या प्रशिक्षण व लॅबसाठीच्या सेवा विहीत कार्यपध्दतीचे पालन करून घेण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३) उद्योग,उर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय क्र. भांखसं-२०१४/प्र.क.८२ भाग-III/उद्योग-४ दि.३०.१०.२०१५अन्वये वेळोवेळी निर्गमित केलेल्या इतर शासन आदेशान्वये विहीत केलेल्या कार्यध्दतीच काटेकोरपणे अवलंब करण्यात याबा.

४) मंजूर बाबींची अनुज्ञेयता व वापर यानुषंगाने शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या नियमांचे/धोरणांचे/आदेशांचे कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५) सदर योजनेची अंमलबजावणी विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर यांनी करावी.

६)सदर योजनेवरील खर्च, " मागणी क्र.बी-०१,२०५५पोलीस ,११५ पोलीस दलाचे आधुनिकीकरण, (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प,(०१)(०२)महिला व बालकांवरील सायबर क्राईम प्रतिबंधक योजना(२०५५A१२१) ,१३ कार्यालयीन खर्च "या लेखाशिर्षातंर्गत मंजूर अनुदानातून विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर यांनी भागवावा.

सदर प्रयोजनासाठी या लेखाशिर्षांतर्गत प्राप्त होणारा निधी खर्च करण्यासाठी विशेष पोलीस महानिरीक्षक ,सायबर यांना नियंत्रण अधिकारी व कार्यालयीन अधिक्षक ,सायबर यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३२८/१८/व्यय-७, दि.६.११.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासननिर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१९०१०११६५१५६०६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

V. M. Bhat

Digitally signed by V. M. Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, cn=V. M. Bhat
Date: 2019.01.01 16:57:43 +05'30'

**(व्यंकटेश भट)**

उपसचिव,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक,गुन्हे अन्वेषण विभाग,महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
४. विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
५. अधिदान व लेखाधिकारी/निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
६. वित्त विभाग (का.व्यय-७),मंत्रालय,मुंबई.
७. निवड नस्ती (विशा-६) कार्यासन ,गृह विभाग .